घोडबंदर ते गायमुख उन्नत मार्ग आणि गायमुख ते ठाणे रस्ते विकास प्रकल्पासंदर्भात अभ्यास समिती स्थापन करणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०१२२/प्र.क्र.२२/फ-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- १७ फेब्रुवारी, २०२२

**प्रस्तावना :-**

राज्य वन्यजीव मंडळाची १७ वी बैठक दि. १२.१०.२०२१ रोजी संपन्न झाली असून, सदर बैठकीमध्ये विषय क्र. ७.१२ अन्वये घोडबंदर ते गायमुख उन्नत मार्ग आणि गायमुख ते ठाणे अस्तित्वात असलेल्या रस्त्याच्या रुंदीकरणाकरीता ८.८४५१ हे. वनजमिन वळतीकरणाचा महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांचा प्रस्ताव चर्चेसाठी आला होता. सदर प्रकरणी राज्य वन्यजीव मंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार सदर रस्त्याचे पुर्नसंरेखन (Realignment) करुन सुयोग्य संरचनेसह (design) हा रस्ता उन्नत व ६ ते ८ पदरी करणे व त्यावरुन जड वाहनेसुध्दा जाऊ शकतील तसेच सध्या अस्तित्वात असलेल्या मार्गावर वाहतूक पुर्णपणे बंद करुन वन्यजीवांना येण्या-जाण्यासाठी मोकळीक राहील अशा पध्दतीने रस्त्याचा विकास करणेबाबतची शक्यता पडताळण्याकरीता अभ्यास समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

घोडबंदर ते गायमुख उन्नत मार्ग आणि गायमुख ते ठाणे अस्तित्वात असलेल्या रस्त्याच्या रुंदीकरणाकरीता ८.८४५१ हे. वनजमिन वळतीकरणाच्या प्रस्तावासंदर्भात अभ्यास करण्यासाठी भारतीय वन्यजीव संस्था, देहरादून, वाईल्ड लाईफ कन्झर्वेशन ट्रस्ट, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांचे प्रतिनिधी समाविष्ट करून खालीलप्रमाणे अभ्यास समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| १ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई | अध्यक्ष |
| २ | डॉ. बिलाल हबीब, भारतीय वन्यजीव संस्था, देहरादून | सदस्य |
| ३ | डॉ. अनिष अंधेरिया, वाईल्ड लाईफ कन्झर्वेशन ट्रस्ट, मुंबई | सदस्य |
| ४ | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली | सदस्य सचिव |

वरीलप्रमाणे गठित समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील -:

I. सदर रस्त्याचे पुर्नसंरेखन (Realignment) करुन सुयोग्य संरचनेसह (design) हा रस्ता उन्नत व ६ ते ८ पदरी करणे व त्यावरुन जड वाहनेसुध्दा जाऊ शकतील तसेच सध्या अस्तित्वात असलेल्या मार्गावर वाहतूक पूर्णपणे बंद करुन वन्यजीवांना येण्या-जाण्यासाठी मोकळीक राहील अशा पध्दतीने रस्त्याचा विकास करणेबाबतची शक्यता पडताळणे.

२.  समितीने त्यांचा अहवाल १५ दिवसाचे आत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडे सादर करावा. सदर समितीच्या अहवालाच्या अनुषंगाने प्रधान मुख्य वन संरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे अभिप्रायासह अहवाल शासनास सादर करावा.

३.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१७१६३४२५२४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2022.02.17 16:35:57 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
६. उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे
८. वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली
९. उपवनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे
१०.सर्व समिती सदस्य
११.फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई /निवड नस्ती.

*****